**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनेत्तर बाबीकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील माहे जुलै, २०२३ ते सप्टेंबर, २०२३ या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ-२०२३/प्र.क्र.५८/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ४ ऑगस्ट, २०२३.

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल,२०२३.
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, राअआ २०२३/ प्र.क्र.५८/ का.९, दिनांक २ मे, २०२३.
३) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.०४/का-०४/२०२३-२४, दि.१८ जुलै, २०२३ चे पत्र व सहपत्रे.

प्रस्तावना -

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या निधीमधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाचा कार्यालयीन खर्च भागविण्याकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.४१,७५,०००/-(अक्षरी रुपये एकेचाळीस लाख पंच्याहत्तर हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. सदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१२ एप्रिल, २०२३ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ७०% मर्यादेत डिसेबर,२०२३ पर्यत अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाने एकूण अर्थसंकल्पित निधीच्या २०% च्या प्रमाणात रु.८,३५,०००/- एवढे वेतनेत्तर अनुदान वितरणासाठी बिम्स प्रणालीवर उपलब्ध करून दिलेले आहे. त्यापैकी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णय दिनांक २ मे, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.४,१७,५००/- एवढे वेतनेतर अनुदान माहे एप्रिल,२०२३ ते जुन, २०२३ या तीन महिन्यांच्या

कालावधीकरीता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाकरीता वितरीत करण्यात आलेले होते. वितरीत अनुदानापैकी रू.४,१७,५००/- एवढे सर्व वेतनेतर अनुदान खर्च झाले असून त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयोगाने सादर केलेले आहे.

३. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीत निधीपैकी सद्यस्थितीत बिम्स प्रणालीवर उपलब्ध असलेले रु.४,१७,५००/- (अक्षरी रुपये चार लक्ष सतरा हजार पाचशे फक्त) इतके वेतनेतर अनुदान खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पीय अनुदान (रु.)** | **सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी (रूपये)** | **माहे जुलै, २०२३ ते सप्टेंबर, २०२३ या तीन महिन्यांच्या कालावधीकरीता वेतनेतर बाबींकरीता वितरीत करावयाचा निधी (एकूण रूपये)** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४१,७५,०००/- | ४,१७,५००/- | **४,१७,५००/-** |
| | **एकूण** | **४१,७५,०००/-** | **४,१७,५००/-** | ४,१७,५००/- |
| | | | | **(अक्षरी एकूण रुपये चार लक्ष सतरा हजार पाचशे फक्त)** |

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२३-२४ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. आयोगाने कोणत्याही प्रकारची खरेदी वा दुरुस्ती करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे तंतोतंत पालन करावे. तसेच ज्या उद्दीष्टाकरिता निधी वितरीत करण्यात आले आहे केवळ त्याकरिताच खर्च करण्यात यावे. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनास वेळोवेळी सादर करणे बंधनकारक आहे. संदर्भ क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी “मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज

कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३ मधील अटीं शर्तीची पुर्तता होत असून त्यास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८०४१४२११११६१४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2023.08.04 14:26:20 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).